महाराष्ट्र व्यवसायकर अधिनियम, १९७५ अन्वये विशिष्ट कालावधीत नावनोंदणीकरण/नोंदणीकरण करून घेणा-या आणि व्यवसाय कराची सर्व थकबाकी/देय रक्कम भरणा करणा-या व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांना शास्ती, व्याज आणि दंडात्मक कार्यवाही [प्रॉसिक्यूशन] यामध्ये सवलत देण्याची योजना [ॲम्नेस्टी स्कीम]

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक-पीएफटी-१०९४/प्र.क्र. १५/कराधान-१,
दिनांक:- २४ फेब्रुवारी १९९४.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र व्यवसाय, व्यापार, आजीविका आणि नोक-या यावरील कर अधिनियम, १९७५ [व्यवसाय कर कायदा] अन्वये व्यवसाय कर भरण्यास पात्र असलेल्या व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांनी विहित कालावधीत नाव नोंदणीकरण [एनरोलमेंट] अथवा नोंदणीकरण [रजिस्ट्रेशन] करून घेऊन व्यवसाय कर भरणे बंधनकारक आहे. नाव नोंदणीकरण अथवा नोंदणीकरण करण्यात विलंब करणे तसेच व्यवसाय कर भरण्यास विलंब करणे आणि कायद्याच्या तरतुदींचा भंग करणे या अपराधासाठी सदर कायद्यामध्ये शास्ती, व्याज आणि दंडात्मक कार्यवाही [प्रॉसिक्यूशन] करण्याची तरतूद आहे. असे असले तरी अद्यापही अनेक व्यक्ती, संस्था आणि आस्थापना नोंदणीकरण करून न घेता व्यवसाय कर चुकवेगिरी करत आहेत, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अशा दोषी व्यक्ती/संस्था [डिफॉल्टर] यांना काही प्रोत्साहनपर सवलत दिल्यास संबंधित व्यक्ती/संस्था आणि आस्थापना नोंदणीकरण करून घेण्यास आणि व्यवसाय कर भरण्यास उद्युक्त होतील अशी शासनाची धारणा आहे. यादृष्टीने संबंधितांना योग्य ती सवलत देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

शासन आता असे आदेश देत आहे की,

१] दिनांक २५ फेब्रुवारी १९९४ ते दिनांक ३१ मार्च १९९४ या कालावधीत नाव नोंदणीकरण [एनरोलमेंट] आणि नोंदणीकरण [रजिस्ट्रेशन] करून घेऊन देय असलेली व्यवसायकराची सर्व मूळ कर रक्कम भरणा करणा-या अनोंदीत व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांना व्यवसायकर कायद्यानुसार लागू होणारी शास्ती आणि व्याज संपूर्णपणे माफ करण्यात यावे तसेच त्यांच्यावर दंडणीय कार्यवाही [प्रॉसिक्यूशन] करण्यात येऊ नये.

..२

२] दिनांक २५ फेब्रुवारी १९९४ पूर्वी व्यवसायकर कायद्यानुसार नोंदीत असलेल्या परंतु विवरणपत्रे दाखल न केलेल्या/विवरणपत्रांप्रमाणे कर भरणा न केलेल्या मालक/आस्थापना यांनी जर दिनांक २५ फेब्रुवारी १९९४ ते दिनांक ३१ मार्च १९९४ या कालावधीत निर्धारणेनुसार देय असलेली अथवा विवरणपत्रे दाखल करुन देय झालेली व्यवसायकराची संपूर्ण मूळ कर रक्कम आणि देय झालेल्या व्याजापैकी ५० टक्के व्याज रक्कम भरणा केली तर कायद्यानुसार लागू होणारी संपूर्ण शास्ती आणि उर्वरित ५० टक्के व्याज संपूर्णपणे माफ करण्यात यावे. तसेच अशा मालक/आस्थापनांवर कायद्यानुसार कोणतीही दंडणीय कार्यवाही [प्रॉसीक्युशन] करण्यात येऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ वि. प्र. कुळकर्णी ]
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित :-

१] महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
२] महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र नागपूर.
३] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४] व्यवसाय कर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, आठवा मजला, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०.
५] रजिस्ट्रार, महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०.
६] निवड नस्ती, कराधान-१.